महाराष्ट्र-कर्नाटक सीमाप्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ...

**वित्तीय वर्ष २०२१-२०२२ मधील जानेवारी ते मार्च, २०२२ या ०३ महिन्याकरिता अनुदानाचे वाटप.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : बीयुडी-१८२१/प्र.क्र.२३/२०२१/३६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ जानेवारी, २०२२

संदर्भ :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.२१.०४.२०१५.
२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.८९/२०२१/२५, दि.०८.०४.२०२१ व दि.२४.०६.२०२१.
३) शासन निर्णय, वि.वि., क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-१८२१/प्र.क्र.२३/२०२१/३६, दि.२९.०४.२०२१.
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-१८२१/प्र.क्र.२३/२०२१/३६, दि.१०.०६.२०२१.
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-१८२१/प्र.क्र.२३/२०२१/३६, दि.०२.०८.२०२१.
७) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-१८२१/प्र.क्र.२३/२०२१/३६, दि.१४.१०.२०२१.
८) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-१८२१/प्र.क्र.२३/२०२१/३६, दि.०९.११.२०२१.

**शासन परिपत्रक :-**

" मागणी क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-१०२-सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन - (००) (०३) महाराष्ट्र कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्तीवेतन ( २२३५ २४९३ ) " या लेखाशीर्षाअंतर्गत प्रत्येकी रु.१०,०००/- दरमहा निवृत्तीवेतन, रु.५००/- प्रवासखर्च व रु.५,०००/-इतर अनुषंगिक लाभ अदा करण्यासाठी सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षासाठी एकूण रु.१७,५७,०००/- (रुपये सतरा लक्ष सत्तावन्न हजार फक्त) एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर केलेली आहे. त्यापैकी माहे एप्रिल, २०२१ या ०१ महिन्याचा खर्च भागविण्याकरीता उपलब्ध झालेल्या अनुदानातून दरमहा निवृत्तीवेतन व वार्षिक प्रवासभत्ता यासाठी रु.१,४७,०००/- (रुपये एक लाख सत्तेचाळीस हजार फक्त), माहे मे व जून, २०२१ या ०२ महिन्यांसाठी प्रत्येकी रु.१०,०००/- दरमहा निवृत्तीवेतनासाठी असे एकूण रु.२,८०,०००/-, माहे जुलै ते सप्टेंबर या ०३ महिन्यांसाठी प्रत्येकी रु.१०,०००/- दरमहा निवृत्तीवेतनासाठी असे एकूण रु.४,२०,०००/-, माहे ऑक्टोबर, २०२१ या ०१ महिन्यासाठी प्रत्येकी रु.१०,०००/- दरमहा निवृत्तीवेतनासाठी असे एकूण रु.१,४०,०००/- इतके अनुदान, अनुक्रमे संदर्भ क्र.४ येथील दि.२९.०४.२०२१, संदर्भ क्र.५ येथील दि.१०.०६.२०२१, संदर्भ क्र.६ येथील दि.०२.०८.२०२१ व संदर्भ क्र.७ येथील दि.१४.१०.२०२१ तसेच संदर्भ क्र.८ येथील दि.०९.११.२०२१ च्या परिपत्रकांन्वये पुढील परिच्छेद क्र.२ खालील तक्त्यातील रकाना क्र.४ मध्ये नमूद केल्यानुसार महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व प्रवास भत्ता अदा करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरित केलेले आहेत.

२. वित्त विभागाने दि.१८.०१.२०२२ रोजीच्या टिप्पणीन्वये रु.०३.८९ लाख इतकी आर्थिक तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे. त्यामुळे सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील माहे जानेवारी ते मार्च, २०२२ या ०३ महिन्याच्या निवृत्तीवेतनाचा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) एकूण रु.४,३९,७५०/- इतके उपलब्ध अनुदान विचारात घेता, या योजनेअंतर्गत एकूण १४ लाभार्थ्यांना दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी प्रमाणे माहे जानेवारी ते मार्च, २०२२ या ०३ महिन्याचे निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी एकूण रु.४,२०,०००/- (रुपये चार लाख वीस हजार फक्त) चे अनुदान संबधित जिल्हाधिकारी यांना पुढील तक्त्यातील रकाना क्र.५ मध्ये नमूद केल्यानुसार वितरीत करण्यात येत आहेत.

| अनु. क्र. | जिल्हाधिकारी कार्यालयाचे नाव (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०२१-२०२२ एकूण मंजूर अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | एप्रिल ते डिसेंबर, २०२१ या ९ महिन्यांसाठी निवृत्तीवेतन व प्रवासभत्ता करीता वितरीत केलेले एकूण अनुदान (रुपये) | निवृत्तीवेतन (दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी प्रमाणे) जानेवारी-मार्च, २०२२ या ०३ महिन्यासाठी वितरीत अनुदान (रुपये) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुंबई शहर (३) | ३,७६,५०० | २,७१,५०० | ९०,००० | ३,६१,५०० |
| २ | कोल्हापूर (९) | ११,२९,५०० | ८,१४,५०० | २,७०,००० | १०,८४,५०० |
| ३ | पुणे (१) | १,२५,५०० | ९०,५०० | ३०,००० | १,२०,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | १,२५,५०० | ९०,५०० | ३०,००० | १,२०,५०० |
| एकूण अनुदान | | १७,५७,००० | १२,६७,००० | ४,२०,००० | १६,८७,००० |

३. सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-

१) माहे जानेवारी ते मार्च, २०२२ या ०३ महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी, त्यांना वितरीत केलेल्या तरतुदीइतक्या मर्यादेत ठेवावा.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयमधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनासदेखील पाठवावी. कुठल्याही परिस्थितीत "२२३५२४९३" या लेखाशीर्षाखालीच या रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

४. हे परिपत्रक, सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक, क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.८९/२५, दि.०८.०४.२०२१ व दि.२४.०६.२०२१ व वित्त विभागाचे परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ मधील सूचना व अनौ.सं.क्र.१४/२०२२/व्यय-४, दिनांक १८/०१/२०२२ अन्वये दिलेली मान्यता विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०१२११६०३०४६१०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LALIT NAMDEO SADAFULE

Digitally signed by LALIT NAMDEO SADAFULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49d0b6bfb0d78bba142b040bbfdee534c7aa6db30b0e4d3a918fd1d910da93a1, pseudonym=CF7869D531604C280DB49A935EC5C18D7A958EAA, serialNumber=7BF3E1EAC0AB4A8E9144C78EA332CE94C22440C2D337AB6119823044B2D0A3AB, cn=LALIT NAMDEO SADAFULE
Date: 2022.01.21 16:04:42 +05'30'

(ल. ना. सदाफुले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
४. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई.
७. जिल्हाधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
८. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
१२. सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (कार्या.३६).